**सहायक प्रशिक्षणार्थी सल्लागार, गट-ब (राजपत्रित) (तांत्रिक) महाराष्ट्र शिक्षण सेवा या पदावर सरळसेवेने नियुक्ती देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग**

**शासन आदेश क्रमांक: व्यशिअ-२०१५/प्र. क्र. ४३८/व्यशि-१,**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक: ०४ जुलै, २०२४.

**संदर्भ :-** उप सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई यांचे पत्र क्र.१५(०२)(१८३)/७१०/ अठ्ठावीस, दिनांक १५/०१/२०२४

**प्रस्तावना:**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने प्रसिध्द केलेल्या जाहिरात क्र. १३३/२०१४ च्या अनुषंगाने मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे सहायक प्रशिक्षणार्थी सल्लागार, गट-ब (राजपत्रित) (तांत्रिक), महाराष्ट्र शिक्षण सेवा या पदावर प्रतिक्षायादीतून नियुक्ती मिळावी या मागणीसाठी श्री. गंगाराम रामदास कर्पे यांनी मूळ अर्ज क्र. ४६५/२०१७ दाखल केला होता. सदर प्रकरणी मा. न्यायाधिकरणाने दि. २५/०८/२०२३ रोजी दिलेल्या आदेशानुसार श्री. कर्पे यांना सहायक प्रशिक्षणार्थी सल्लागार, गट-ब (राजपत्रित) (तांत्रिक), महाराष्ट्र शिक्षण सेवा या पदावर प्रतिक्षायादीतून नियुक्ती देण्यासाठी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने संदर्भाधीन दि. १५/०१/२०२४ रोजीच्या पत्रान्वये शिफारस केली आहे. त्या अनुषंगाने श्री. कर्पे यांना सहायक प्रशिक्षणार्थी सल्लागार, गट-ब (राजपत्रित) (तांत्रिक), महाराष्ट्र शिक्षण सेवा या पदावर सदर शासन निर्णयातील अटी व शर्तीनुसार सरळसेवेने तात्पुरती नियुक्ती देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन आदेश :**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयातील सहायक प्रशिक्षणार्थी सल्लागार, गट-ब (राजपत्रित) (तांत्रिक), महाराष्ट्र शिक्षण सेवा (वेतनस्तर एस- १७ : रु. ४७६००- १५११००/-) या पदावर खाली नमूद केलेल्या उमेदवाराची त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या कार्यालयामध्ये, ते ज्या दिनांकापासून पदाचा कार्यभार स्विकारतील त्या दिनांकापासून २ वर्षाच्या परिविक्षाधीन कालावधीसाठी त्यांची नामनिर्देशनाद्वारे तात्पुरती नियुक्ती खालीलप्रमाणे करण्यात येत आहे:-

| अ. क्र. | उमेदवाराचे नाव | वर्गवारी | आयोगाने नियुक्तीसाठी शिफारस केलेला प्रवर्ग | वाटप करण्यात आलेला विभाग | नामनिर्देशनाद्वारे करावयाचे पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|---|---|
| 1 | 2 | 3 | 4 | | 5 |
| १ | श्री. गंगाराम रामदास कर्पे | इ.मा.व. | इमाव (सर्वसाधारण) | कोकण-२ | सहाय्यक प्रशिक्षणार्थी सल्लागार, मुलभूत प्रशिक्षण तथा अनुषंगिक सुचना केंद्र, द्वारा औद्योगिक प्रशिक्षण संस्था, ठाणे, जि. ठाणे. (रिक्त पदी) |

२. सदर नियुक्ती खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून करण्यात येत आहे:-

i) उपरोक्त उमेदवाराचे जात वैधता प्रमाणपत्र नियुक्तीच्या दिनांकापासून सहा महिन्याच्या मुदतीत प्राप्त न झाल्यास कोणतीही पुर्वसूचना न देता त्यांच्या सेवा समाप्त करण्यात येतील.

ii) उपरोक्त उमेदवार यापूर्वी हिंदी व मराठी भाषेच्या परीक्षा उत्तीर्ण झालेला नसल्यास किंवा त्या परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसल्यास त्या परीक्षा त्यांना विहीत मुदतीत उत्तीर्ण होणे आवश्यक आहे.

iii) उपरोक्त उमेदवाराने शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.प्रशिक्षण-२०००/ प्र.क्र.६१/२००१/३९, दि.१९/०३/२००३ मधील तरतुदीनुसार संगणक हाताळणे/वापराबाबतचे शासन मान्यताप्राप्त प्रमाणपत्र नियुक्तीच्या दिनांकापासून दोन वर्षाच्या आत विभाग प्रमुखाकडे सादर करणे अनिवार्य राहील.

iv) परिविक्षाधीन कालावधीत संबंधित उपरोक्त उमेदवाराने कामाचा दर्जा प्राप्त न केल्यास किंवा विहीत विभागीय परीक्षा काही असल्यास विहीत कालावधीत उत्तीर्ण न केल्यास किंवा त्यांचे काम किंवा वर्तणूक समाधानकारक न आढळल्यास त्यांना कोणतीही पूर्व सूचना न देता सेवेतून कमी करण्यात येईल.

v) उपरोक्त उमेदवाराची सहायक प्रशिक्षणार्थी सल्लागार, गट-ब (राजपत्रित) (तांत्रिक), महाराष्ट्र शिक्षण सेवा या पदावरील ज्येष्ठता महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या गुणवत्ताक्रमानुसार राहील.

vi) उपरोक्त उमेदवारांचे वेतन महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम १९८१ मधील तरतुदीनुसार निश्चित करण्यात यावे.

vii) उपरोक्त उमेदवाराला शासन निर्णय, शालेय शिक्षण व सेवायोजन विभाग क्रमांक:एससीटी ६५६३/ए, दि.१८ जानेवारी, १९६३ अन्वये विहीत करण्यात आलेला करारनामा करावा लागेल.

याबाबत आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालय (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई) यांनी आवश्यक ती कार्यवाही करावी.

viii) वरील उमेदवाराने त्याच्या नावासमोर निर्देशिलेल्या पदावर आदेशाच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत रुजू व्हावे.

ix) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक:अंनियो-१००९/प्र.क्र.३२/सेवा-४, दि.१८/८/२००९ मधील तरतुदीनुसार दि.१ नोव्हेंबर, २००५ पूर्वी शासन सेवेत निवृत्तिवेतनार्ह आस्थापनेवर कार्यरत असलेल्या शासकीय कर्मचाऱ्यांचे त्याच किंवा अन्य विभागातील निवृत्तिवेतनार्ह आस्थापनेच्या पदावरील नियुक्तीसाठी दिनांक १ नोव्हेंबर, २००५ पूर्वी किंवा त्यानंतर अर्ज केला असेल तर अशा प्रकरणी शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक:अंनियो-१००६/८७/सेवा-४ दि.१२ जानेवारी, २००७ मधील (i) ते (iv) येथे नमूद केलेल्या सर्व अटींची पूर्तता झाल्यास संबंधित शासकीय कर्मचाऱ्यास महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन), नियम, १९८२ व सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना लागू ठरतील. दि. १८/८/२००९ च्या परिपत्रकात नमूद (i) ते (iv) येथील अटींची पूर्तता ज्या प्रकरणी होत नसेल, अशा शासकीय कर्मचाऱ्यास नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना लागू ठरेल.

**३.** उपरोक्त उमेदवारास वर नमूद केलेल्या अटी व शर्ती व्यतिरिक्त महाराष्ट्र शासनाच्या अधिपत्याखालील राज्यसेवा अधिकाऱ्यांना जे सेवाविषयक नियम लागू आहेत ते लागू होतील.

**४.** उपरोक्त उमेदवारास नियुक्तीच्या ठिकाणी उपस्थित राहण्यासाठी प्रवासभत्ता अनुज्ञेय होणार नाही.

**५.** आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालय (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई) यांनी श्री. कर्पे यांना संबंधित पदावर रुजू करुन घेण्याची कार्यवाही तात्काळ करावी व केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.

**६.** सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक क्र.: २०२४०७०४१५१८४७५६०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRADEEP SAHEBRAO SHIVTARE

Digitally signed by PRADEEP SAHEBRAO SHIVTARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SKILL EMPLOYMENT ENTREPRENEURSHIP AND INNOVATION DEPARTMENT, 2.5.4.20=12a2d958f75709e9720b38b5349dae16ef85e08a91e69f77d8b94222ab9dc13c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=415BAA8242ED5D99644FE1533246B0A85DC3D52848FB6CE23F47DAF8D647AE5A, cn=PRADEEP SAHEBRAO SHIVTARE
Date: 2024.07.04 15:29:55 +05'30'

**( प्रदीप सा. शिवतरे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मंत्री, कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

२) सचिव, कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, मंत्रालय, मुंबई.

३) आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालय (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई)

४) संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, म.रा., मुंबई-१.

५) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राद्वारे)

६) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर.

७) महालेखापाल, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.

८) संबंधित सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय (संचालकांमार्फत).

९) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी (संचालकांमार्फत)

१०) संबंधित उपकोषागार अधिकारी, (संचालकांमार्फत)

११) श्री. गंगाराम रामदास कर्पे

१२) निवड नस्ती (व्यशि-१)